9 R-200407211457320001-0300

केबल दूरचित्रवाणीवरील करमणूक शुल्काची
जाहीर लिलाव पध्दतीने करण्याच्या प्रस्तावाच्या
अंमलबजावणीकरीता मुंबई करमणूक शुल्क
अधिनियम, १९२३ मध्ये सुधारणा करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : ईएनटी-१००२/प्र.क्र.२७४/टी-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ७ एप्रिल,२००३.

संदर्भ : शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग क्रमांक : ईएनटी १००२/
प्र.क्र.२७४/टी-१, दिनांक १७ मार्च, २००३.

**शासन निर्णय**

केबल दूरचित्रवाणी उद्योगाची अतिशय वेगाने वाढ होत आहे. परंतु पुरेशा मनुष्यबळाअभावी सर्व केबल जोडण्यांवरील देय करमणूक शुल्काची वसुली होऊ शकत नाही. त्यामुळे वसुलीवरील खर्च कमी करुन, उत्पन्न वाढविण्याच्या दृष्टीकोनातून केबल दूरचित्रवाणीवरील करमणूक शुल्काची लिलाव पध्दतीने वसुली करण्याकरीता मुंबई करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ मध्ये सुधारणा करण्याचा शासनाने निर्णय घेतला होता. सदर निर्णयाच्या अनुषंगाने केबल दूरचित्रवाणीवरील करमणूक शुल्काची (थेट घरपोच प्रसारण सेवेवरील वसुलीयोग्य करमणूक शुल्कासह) जाहीर लिलाव पध्दतीने वसुली करण्याच्या प्रस्तावास मंत्रिमंडळाने मान्यता दिल्यानंतर, मा.मंत्री (वित्त) यांनी त्यांच्या गतवर्षीच्या अर्थसंकल्पिय भाषणात त्यासंबंधी घोषणा केली होती. त्या अनुषंगाने मुंबई करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ मध्ये, जरुर ती सुधारणा करण्यात आली आहे.

२. वरील तरतुदींच्या अनुषंगाने "केबल दूरचित्रवाणीवरील करमणूक शुल्काची (थेट घरपोच प्रसारण सेवेवरील वसुलीयोग्य करमणूक शुल्कासह) जाहीर लिलाव पध्दतीने केलेली वसुली नियम, २००२" चे प्रारुप नियम दिनांक १ ऑक्टोबर, २००२ रोजी महाराष्ट्र शासन राजपत्र (असाधारण) मध्ये प्रसिध्द करण्यात आले होते. सदर प्रारुप नियमांच्या अनुषंगाने बाधा पोहोचण्याचा संभव असणा-या व्यक्तींचे अथवा कोणत्याही व्यक्तीकडून दिनांक १६ ऑक्टोबर, २००२ रोजी किंवा त्यापूर्वी हरकती किंवा सूचना मागविण्यात आल्या होत्या. प्रारुप नियमासंबंधी प्राप्त झालेल्या हरकती तपासून नियम अंतिम करण्यात आले असून, "केबल दूरचित्रवाणीवरील

करमणूक शुल्काची (थेट घरपोच प्रसारण सेवेवरील वसुलीयोग्य करमणूक शुल्कासह) जाहीर लिलाव पध्दतीने केलेली वसुली नियम, २००२" चे अंतिम नियम दिनांक १७ मार्च, २००३ रोजी महाराष्ट्र शासन राजपत्र (असाधारण) मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहेत.

३. अंतिम नियमातील तरतुदोनुसार चालू वित्तिय वर्षात केबल दूरचित्रवाणीवर करमणूक शुल्काची लिलाव पध्दतीने वसुली करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

४. उपरोक्त नियमातील तरतुदीनूसार केबल दूरचित्रवाणीवरील करमणूक शुल्काची लिलाव पध्दतीने वसुली करण्यासाठी अभिकर्ता नियुक्त करण्याकरिता निविदा मार्गावण्यास, शासन, या निर्णयाद्वारे मंजुरी देत आहे.

५. उपरोक्त दिनांक १७ मार्च २००३ च्या अधिसूचनेच्या प्रत्येकी ५ प्रती आवश्यक त्या कार्यवाहीसाठी सोबत जोडल्या आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(माधव काके)
कार्यासन अधिकारी,
महसूल व वन विभाग.

सोबत : वरीलप्रमाणे.

प्रति,
१. सर्व विभागीय आयुक्त.
२. सर्व जिल्हाधिकारी.

प्रत अग्रेषित :-
१. प्रधान सचिव (विधी विधान), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
२. प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
३. प्रधान सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. सर्व पोलीस आयुक्त.
५. निवडनस्ती, टी-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.